सुधारित प्रकल्प अहवालास अंतीम मान्यता देण्याबाबत.
**हरणाई सहकारी सूतगिरणी मर्या.,वेळीव, ता.खटाव, जि.सातारा.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : प्रकल्प १२२२/प्र.क्र.६/टेक्स१ (अ)**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ०८ जून, २०२३.

वाचा:-

१. शासन निर्णय, सहकार व वस्त्रोद्योग विभाग क्र.सूतगि-२१९३/प्र.क्र.१८६/टेक्स-१, दि.११.०८.१९९३.
२. शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. सूतगि ११९७/प्र.क्र.१९३/ टेक्स १, दि.२४.०३.१९९९.
३. शासन निर्णय, सहकार व वस्त्रोद्योग विभाग क्र.प्रकल्प -१२१५ /प्र.क्र.८२/ टेक्स-१(अ), दि.२५.११.२०१३.
४. शासन निर्णय, सहकार व वस्त्रोद्योग विभाग क्र.सूतगि-३३१६/प्र.क्र.८१/ टेक्स-१ (अ), दि.१०.०७.२०१७.
५. शासन निर्णय, सहकार व वस्त्रोद्योग विभाग क्र.प्रकल्प -१२१३/प्र.क्र.५०/ टेक्स-१ (अ),दि.१७.०६.२०२१.
६. शासन निर्णय, सहकार व वस्त्रोद्योग विभाग क्र. प्रकल्प १२२२/प्र.क्र.६/टेक्स१ (अ) दि.२४.०६.२०२२.
७. शासन निर्णय, सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र.प्रकल्प-१२२३/प्र.क्र.८ / टेक्स-१ (ब), दि.१३.३.२०२३.
८. आयुक्त (वस्त्रोद्योग), नागपूर यांचे पत्र क्र.कार्या-६(१) (सूतगि)/सुधारीत प्रकल्प अहवाल/हरणाई/२१५३/२०२३, दिनांक २८.०४.२०२३.
९. शासन पत्र, सहकार,पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र: संकीर्ण-३१२२/प्र.क्र.११/ टेक्स १(ब), दिनांक ३१.५.२०२३.

**प्रस्तावना :-**

हरणाई सहकारी सूतगिरणी मर्या., वेळीव, ता.खटाव, जि.सातारा या सूतगिरणीची नोदणी दि.१७.१०.१९९४ रोजी करण्यात आली आहे. शासन निर्णय दि.१६.०१.१९९६ अन्वये या सूतगिरणीचा समावेश आठव्या पंचवार्षिक योजनेत करून शासकीय अर्थसहाय्यासाठी निवड करण्यात आली आहे. शासन निर्णय दि.२५.११.२०१३ नुसार, सुतगिरणीचा प्रकल्प अहवाल रू.६०००.०० लाख इतका सुधारीत करण्यात आला आहे. शासनाने दि.१७.०६.२०२१ रोजीच्या शासन निर्णयन्वये, राज्यातील सहकारी सूतगिरण्यांची प्रकल्प किंमत रु.८०९०.०० लाख इतकी निश्चित केली आहे. शासनाने यापूर्वी अर्थसहाय्य केलेल्या आठव्या, दहाव्या व बाराव्या पंचवार्षीक योजना काळातील ज्या सहकारी सूतगिरण्याचे प्रकल्प पूर्ण क्षमतेने सुरु झालेले नाहीत अशा सहकारी सूतगिरण्यांना देखील प्रो-रेटा पध्दतीने रु.८०९०.०० लाख

प्रकल्प किंमत लागू करण्याचा निर्णय घेतलेला आहे. सदर निर्णयाच्या अनुषंगाने या सूतगिरणीने महाराष्ट्र राज्य सहकारी वस्त्रोद्योग महासंघ, मुंबई यांचेकडून २५२०० चात्यांचा रू.७७०३.०० लाखांचा प्रकल्प तयार करून घेतला आहे. तर आयुक्त, वस्त्रोद्योग, नागपूर यांनी दि.२९.१२.२०२१ रोजीच्या पत्रान्वये रु.६११७.८३ लाख इतका सुधारित प्रकल्प अहवाल सुकाणू समितीच्या मंजूरीसाठी सादर केला होता. प्रो-रेटा कसा निश्चित करावा याबाबत आयुक्त, वस्त्रोद्योग, नागपूर यांच्या अध्यक्षतेखाली समिती नेमण्याचा निर्णय दि.०३.०२.२०२२ रोजी झालेल्या सुकाणू समितीच्या बैठकीत झाला. त्यानुषंगाने सूतगिरण्यांची प्रो-रेटा पद्वतीने सुधारीत प्रकल्प किंमत निश्चित करण्यासाठी दि.२३.०२.२०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये वस्त्रोद्योग, आयुक्त, यांच्या अध्यक्षतेखाली समिती गठीत करण्यात आली आहे. या शासन निर्णयाच्या अनुषंगाने आयुक्त, वस्त्रोद्योग, नागपूर यांनी दि.१९.०४.२०२२ रोजीच्या पत्रान्वये अहवाल सादर करण्यात आला तथापि, सदर अहवालामध्ये सूतगिरणीचे प्रकल्प अहवाल किंमत सुधारीत करण्यासाठी प्रो-रेटा पध्दतीने सुतगिरणीची सुधारीत प्रकल्प निश्चित करण्याबाबत समितीने वेगवेगळया शिफारशी केल्या. त्यामुळे शासनाने दि.२०.०६.२०२२ रोजीच्या पत्रान्वये सदर मुद्याबाबत एकमताने शिफारस करण्याबाबत आयुक्त, वस्त्रोद्योग, नागपूर यांना कळविले, त्यावर आयुक्त, वस्त्रोद्योग, नागपूर यांनी दि.२२.०६.२०२२ पत्रान्वये असे कळविले की, सदर गठीत करण्यात आलेल्या समितीमधील सदस्यापैंकी ३ सदस्य शासकिय व ३ सदस्य अशासकिय असल्याने समितीच्या अहवालामध्ये एकमत होण्याची शक्यता नसल्याने याबाबत मा.मंत्री (वस्त्रोद्योग) यांच्या अध्यक्षतेखाली बैठक घेऊन निर्णय घेणे उचित होईल. त्यानुसार दि.२३.०६.२०२२ मा.मंत्री (वस्त्रोद्योग) यांच्याकडे बैठक होऊन प्रो-रेटा पदध्तीने सुतगिरणीची सुधारीत प्रकल्प किंमत निश्चित करण्यात बाबत निर्णय घेण्यात आले. हरणाई सहकारी सूतगिरणी मर्या., वेळीव, ता.खटाव, जि.सातारा या सूतगिरणीच्या सुधारीत प्रकल्प किंमत निश्चितीबाबत मा.मंत्री वस्त्रोद्योग यांच्या अध्यक्षतेखाली दि.२३.०६.२०२२ रोजी झालेल्या बैठकीमध्ये, सहकारी सुतगिरणीच्या प्रकल्प अहवाल किंमत सुधारीत करण्यासाठी प्रो-रेटा पध्दतीने सुधारीत प्रकल्प निश्चित करण्याबाबत दि.२३.०६.२०२२ रोजीच्या बैठकीमधील निर्णयानुसार आयुक्त, वस्त्रोद्योग, नागपूर यांचे कडून हरणाई सहकारी सूतगिरणी मर्या., वेळीव, ता.खटाव, जि.सातारा या सूतगिरणीच्या सुधारीत प्रकल्प अहवाल किंमत सुधारीत करण्या संदर्भात सुधारीत प्रस्ताव शासनास प्राप्त झाल्या नंतर या सूतगिरणीच्या सुधारीत प्रकल्प अहवाल किंमतीस अंतीम मान्यता देण्यात येईल, तथापि, सध्या हरणाई सहकारी सूतगिरणी मर्या., वेळीव, ता.खटाव, जि.सातारा या सूतगिरणीच्या रू.७७०३.०० लाख या प्रकल्प किंमतीस तत्वत: मान्यता देण्यात यावी असा निर्णय सुकाणू समितीच्या बैठकीत घेण्यात आला. **त्यानुसार हरणाई सहकारी सूतगिरणी मर्या., वेळीव, ता.खटाव, जि.सातारा या सूतगिरणीच्या रू.७७०३.०० लाख इतक्या प्रकल्प**

**किंमतीस शासन निर्णय दिनांक २४.६.२०२२ अन्वये तत्वत: मंजूरी देण्यात आली होती.** आत्ता शासन निर्णय दिनांक १३.३.२०२३ मधील सूचनेनुसार आयुक्त वस्त्रोद्योग, वस्त्रोद्योग आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी दि.२८.०४.२०२३ रोजीच्या पत्रान्वये सुधारित प्रकल्प अहवाल प्रस्ताव सुकाणू समितीच्या मंजूरीसाठी शासनास सादर केला. सुकाणू समितीच्या दि.२९.०५.२०२३ रोजी झालेल्या बैठकीत हरणाई सहकारी सूतगिरणी मर्या., वेळीव, ता.खटाव, जि.सातारा या सूतगिरणीच्या प्रकल्प अहवालात दर्शविलेल्या किंमतीबाबत चर्चा करुन प्रकल्प अहवालाची रु.६९२१.८४ लाख किंमतीचा अंतीम मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**<u>शासन निर्णय :-</u>**

हरणाई सहकारी सूतगिरणी मर्या., वेळीव, ता.खटाव, जि.सातारा या सूतगिरणीची सध्याची रु.६०००.०० लाख रक्कमेची प्रकल्प किंमत रु.८०९०.०० लाख किंमतीच्या मर्यादेत प्रो-रेटा नुसार रु.६९२१.८४ लाख इतक्या रक्कमेच्या सुधारित प्रकल्प किंमतीस, त्या त्या बाबींसाठी मंजूर कमाल मर्यादेपेक्षा जास्त होणारा खर्च सूतगिरणी स्वनिधी उभारुन करेल या अटीवर तसेच खालील अटीच्या अधीन राहून अंतिम मान्यता देण्यात येत आहे : -

"सूतगिरणीने स्वतः उभारावयाचे सभासद भागभांडवल, शासनाकडून उपलब्ध झालेले भागभांडवल व प्रकल्प किंमतीच्या ५०% कर्जाची रक्कम पूर्णपणे खर्च झाल्याचे प्रमाणपत्र प्राप्त झाल्यानंतरच सूतगिरणीस वाढीव प्रकल्प किंमतीनुसार देय असलेले शासकीय भागभांडवल मंजूर करण्यात येईल."

२. सदर सुतगिरणीवर खालील बाबी बंधनकारक राहतील.

१. सूतगिरणीच्या कामासाठी कालबध्द कार्यक्रम (Time bound Program) आखून घ्यावा व त्यानुसार सूतगिरणीची उभारणी विहित कालावधीत करावी.
२. शासन निर्णय दि.२४.३.१९९९ मधील सूतगिरणी परतफेडीस पात्र होण्याबाबतच्या अटीमध्ये दि.१०.०७.२०१७ रोजीच्या शासन निर्णयान्वये सुधारणा करण्यात आली असून सदरची सुधारणा या सूतगिरणीसाठी बंधनकारक राहील.
३. सूतगिरणीस निधी उभा करण्यासाठी कोणती बँक कर्ज देणार आहे, त्या बँकेचे कर्ज मंजूर करण्यात येत असल्याबाबतचे पत्र सादर करावे.
४. सूतगिरणीच्या कामकाजावर व प्रकल्प उभारणीवर लक्ष देऊन त्याबाबतचा तिमाही प्रगती अहवाल आयुक्त वस्त्रोद्योग, नागपूर यांनी विहित विवरणपत्रात शासनास सादर करावा.
५. सूतगिरणीचा प्रकल्प एक पथदर्शक प्रकल्प म्हणून उभा राहील याबाबत सूतगिरणीने तसेच आयुक्त वस्त्रोद्योग, नागपूर यांनी दक्षता घ्यावी.
६. सदर सूतगिरणी सर्वसाधारण प्रवर्गातील असल्याने शासनाने भविष्यात काही अटी/शर्ती घातल्यास त्या या सूतगिरणीवर बंधनकारक असतील.

७. दि.१७ ऑक्टोबर, २०१६ रोजीच्या राजपत्रान्वये राज्यातील सहकारी संस्थांवर दोन शासकीय सदस्य नेमण्याच्या अनुषंगाने महाराष्ट्र सहकारी संस्था अधिनियम, १९६० मध्ये सुधारणा करण्यात आली असून सदर निर्णय या सूतगिरणीस बंधनकारक राहील.

३. या सूतगिरणीचे सभासद भागभांडवल व शासकीय भागभांडवल यांचे प्रमाण १:९ असे राहील. त्यानुसार सूतगिरणीने पुढीलप्रमाणे निधी उपलब्ध करावयाचा आहे.

| **अ. क्र.** | **तपशिल** | **प्रकल्प किंमतीनुसार उभारावयाची रक्कम (रुपये लाखात)** |
|---|---|---|
| १ | सभासद भागभांडवल (५%) | ३४६.०९ |
| २ | शासकीय भागभांडवल (४५%) | ३११४.८३ |
| ३ | दिर्घ मुदती कर्ज (५०%) | ३४६०.९२ |
| | **एकूण** | **६९२१.८४** |

४. या सूतगिरणीचा प्रकल्प किंमतीचा बाबनिहाय तरतुदीचा तपशील खालीलप्रमाणे राहील व त्यामर्यादेत या सूतगिरणीने खर्च करणे सूतगिरणीस बंधनकारक राहील.

**(रु.लाखात)**

| **अ. क्र.** | **तपशिल** | **प्रकल्प अहवाल किंमत** | **रू.८०९०.०० लाखाच्या प्रस्तावातील बाबनिहाय खर्च** | **प्रो-रेटा प्रमाणे गणना केलेली रक्कम** |
|---|---|---|---|---|
| १ | जमीन व जमीन सुधारणा | ५८.०६ | १७२.०० | ६९.०६ |
| २ | फॅक्टरी इमारत व इतर बांधकाम | १०४१.०६ | १९०८.४५ | १५०६.५२ |
| ३ | प्लँट अँड मशिनरी | ३१०२.७८ | ४०६७.३० | ३५५४.५३ |
| ४ | इतर कायम मालमत्ता | ८४५.०० | ९११.०० | ८२१.७० |
| ५ | स्टोअर्स व स्पेअर्स | ६१.०० | ८८.८७ | ७५.४९ |
| ६ | मार्जीन मनी | २०८.१६ | ४११.१२ | ४१०.१७ |
| ७ | प्रिऑपरेटिव्ह खर्च | ४१०.१७ | १८७.०० | १९५.०८ |
| ८ | कॉन्टीजंसी | २७३.७७ | ३४४.३३ | २८९.२९ |
| | **एकूण** | **६०००.००** | **८०९०.००** | **६९२१.८४** |

५. सूतगिरणीने रू. **६९२१.८४** लाख इतक्या किंमतीमध्ये प्रकल्पाची उभारणी पूर्ण करावी. शासनाकडून देय भागभांडवलाची रक्कम निधीच्या उपलब्धतेप्रमाणे देण्यात येईल. प्रकल्प पूर्ण करण्यासाठी वरीलप्रमाणे त्या त्या प्रयोजनासाठी मंजूर किंमतीपेक्षा जास्त रक्कम खर्च झाल्यास जास्तीची रक्कम सूतगिरणीने स्वनिधीतून उभी करणे आवश्यक राहील. प्रकल्पावर अतिरिक्त होणारा खर्च सूतगिरणीला स्वत: करावा लागेल. तसेच यंत्रसामुग्री खरेदी व

स्थापत्य बांधकामासाठी शासन निर्णय दि.१५.०६.२००६ व दि.२८.०३.२०१८ नुसार मान्यता घ्यावी. सूतगिरणीच्या संचालक मंडळाने सूतगिरणीच्या खर्चावर कडक नियंत्रण ठेवावे व अनावश्यक खर्च टाळावा.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०६०८१५५९५१९७०२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

PRASENJEET D KARLEKAR

Digitally signed by PRASENJEET D KARLEKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=COOPERATION MARKETING AND TEXTILE DEPARTMENT, 2.5.4.20=d219c43caa42a6d2c11a62256b2ff3ad939a420c9fb6fa0cb24c384214bcee8c, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=58B95820309E7F466AE2AD722C14D2E8910FE2F9D499461E1829267B19AB9CFC, cn=PRASENJEET D KARLEKAR
Date: 2023.06.08 16:02:43 +05'30'

**( प्रसेनजीत कारलेकर )**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
२. अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
३. सचिव (वस्त्रोद्योग), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
४. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे.
५. आयुक्त, वस्त्रोद्योग, वस्त्रोद्योग आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर.
६. जिल्हाधिकारी, सातारा.
७. प्रादेशिक उप आयुक्त, वस्त्रोद्योग, सोलापूर.
८. जिल्हा उप निबंधक, सहकारी संस्था, सातारा.
९. कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी वस्त्रोद्योग महासंघ, मुंबई-०१.
१०. कार्यासन अधिकारी १६-सी / १७-सी, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
११. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई (२ प्रतीत).
१२. अध्यक्ष, हरणाई सहकारी मर्या., वेळीव, ता.खटाव, जि.सातारा.
१३. निवडनस्ती (टेक्स १ (अ)).